सहायक सचिव (तांत्रिक), महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशासकीय सेवा, गट-अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : ससेनि-२०२०/प्र.क्र.(९८/२०)/भाग-२/तांशि-१,**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १८ नोव्हेंबर, २०२१.

**संदर्भ:-** महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांक : १५(१)(१६१)/२९५५/सात, दि.०७/०७/२०२१.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन पत्रान्वये सहायक सचिव (तांत्रिक), महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशासकीय सेवा, गट-अ या पदावर नियुक्तीसाठी प्रतिक्षायादीतून गुणवत्तेनुसार व प्रवर्गनिहाय पात्र असलेल्या खालील २ उमेदवारांची शिफारस केली आहे. त्यानुसार सदर उमेदवारांची त्यांच्या नावासमोर स्तंभ-५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी, ते ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा पदभार स्वीकृत करतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी तात्पुरत्या स्वरूपात नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र | उमेदवाराचे नाव | वर्गवारी | नियमानुसार वाटप करण्यात आलेला महसुली विभाग | पदाचे नाव / पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री. पाटील सागर पापासो | खुला ( सर्वसाधारण ) | कोकण-२ | सहायक सचिव (तांत्रिक), महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई |
| २. | श्री. निकम आशिष आण्णासाहेब | अनुसूचित जमाती (सर्वसाधारण) | कोकण-२ | सहायक सचिव (तांत्रिक), महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई |

२. उपरोक्त दोन्ही उमेदवारांना वैद्यकीय मंडळाने शासकीय सेवेसाठी वैद्यकीयदृष्टया पात्र ठरविले आहे, तशी नोंद त्यांच्या सेवा पुस्तकात घेण्यात यावी.

३. उपरोक्त उमेदवारांपैकी श्री. निकम यांचा चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल शासनास प्राप्त झाला आहे. श्री. पाटील यांचा चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल शासनास अद्याप अप्राप्त आहे. यास्तव श्री. पाटील यांनी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.चारित्र्य-२११७/ प्र.क्र.४८३/२०१७/१६-अ, दि.२८/८/२०१७ नुसार चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून ०६ महिन्यांच्या आत सादर करणे आवश्यक आहे. तसेच उमेदवारांनी सादर केलेले माहिती असत्य असल्याचे आढळून आल्यास त्यांचे सदरचे तात्पुरते नियुक्ती आदेश रद्दबातल करुन भारतीय दंड संहितेनुसार फौजदारी कारवाई करण्यात येईल. तसेच शासन सेवेत कायमस्वरुपी अपात्र ठरविण्यात येईल.

४. उपरोक्त उमेदवारांची नियुक्ती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात येत आहे:-

१) उपरोक्त उमेदवारांची वेतनश्रेणी (सहाव्या वेतन आयोगानुसार रु. १५६००-३९१०० अधिक ग्रेड वेतन रु. ५४००/- ) अशी राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता त्यांना अनुज्ञेय राहील.

३) उपरोक्त उमेदवारांस प्रथम वेतनवाढ परिवीक्षाधीन कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिवीक्षाधीन कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर अनुज्ञेय राहील.

४) उपरोक्त उमेदवारांचे परिवीक्षाधीन कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, असमाधानकारक अथवा अपेक्षित दर्जाची न आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) उपरोक्त उमेदवारांपैकी मागासवर्गीय उमेदवाराचे जाती विषयक दावे संचालक, समाजकल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याशी संबंधित प्राधिकरणाकडून तपासून घेण्याची कार्यवाही संबंधित कार्यालय प्रमुखांनी करावी.

६) उपरोक्त उमेदवारांनी हिंदी व मराठी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा त्यास सदर भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर यासंबंधी असलेल्या नियमानुसार भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ प्रचलित नियमानुसार रोखून ठेवण्यात येईल.

७) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही २०१८/ व्हीआयपी ६७/ प्र.क्र. २०७/ कार्या.१२, दि.२८/०५/२०१८ नुसार उपरोक्त उमेदवारांनी सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत नियुक्तीच्या ठिकाणी रुजू व्हावे. सदर विहीत कालावधीत जर नियुक्तीच्या पदावर रुजू झाला नाही, तर तो उमेदवार नोकरीची संधी गमावेल व त्याचा नियुक्तीकरीता विचार करण्यात येणार नाही. तसेच याकरीता उमेदवाराकडून देण्यात येणा-या कोणत्याही कारणांचा/विनंतीचा विचार करण्यात येणार नाही.

८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अंनियो-१००९/ प्र.क्र.३२/ सेवा-४, दि.१८/०८/२००९ मधील तरतुदीनुसार दि. १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-याने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर, अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-१००६/ ८७/ सेवा-४, दि. १२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधीत शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि. १८/०८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यास नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल.

९) सदर उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे.

१०) उपरोक्त उमेदवारांचे सेवानिवृत्तीचे वय शासनाच्या प्रचलित नियमानुसार राहील.

११) उपरोक्त उमेदवारांस नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१२) उपरोक्त उमेदवारांस शासकीय सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास त्यास शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-१०९२/ १०३३/ प्र.क्र.३३/ ९२/ ८, दि. ०२/१२/१९९७ मधील तरतुदीनुसार शासनास किमान एक महिन्याची पूर्वसूचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील.

१३) प्रस्तुत पदाकरीता आवश्यक असलेल्या शैक्षणिक अर्हतेच्या तरतूदीनुसार उमेदवाराने पदवी स्तरावर किमान प्रथम श्रेणी (first class) धारण करणे आवश्यक आहे. तथापि UGC व AICTE च्या धोरणानुसार काही विद्यापीठे / स्वायत्त संस्थांकडून उमेदवारांना श्रेणी (Class) ऐवजी Grade देण्यात येते. अशा उमेदवारांची पदवी, सेवा प्रवेश नियमातील तरतूदीनुसार प्रथम श्रेणी (first class) किंवा त्याच्याशी समकक्ष आहे, याची खातरजमा संबंधित कार्यालय प्रमुखांनी करूनच उमेदवारांना रूजू करून घ्यावे.

१४) सदर नियुक्ती उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट असल्याचे आढळल्यास सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

१५) सदर आदेश प्राप्त होताच संबंधित उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबंधित कार्यालय प्रमुखांकडे सादर करावा. कार्यालय प्रमुखांनी त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११८१६०७५३७३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5,
pseudonym=B0341853BBBDA46EBB328D4BE0F460D863592476,
serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2021.11.18 16:12:18 +05'30'

**( समीर ढेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित उमेदवार (ई-मेल द्वारे).

**प्रत,**

१) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

२) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,

४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

५) संचालक, तंत्र शिक्षण, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई,
७) सर्व विभागीय सहसंचालक, तंत्र शिक्षण (संचालनालया मार्फत),
८) अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई. (संचालनालया मार्फत),
९) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
१०) निवडनस्ती/ तांशि-१.